**पुस्तकी समायोजनाद्वारे समायोजित**
**अर्थसंकल्पीय तरतूद सन २०२०-२१**
**मागणी क्रमांक वाय-१, २०४९, व्याज प्रदाने**
**भारित (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण**
**कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याज**
**(अनिवार्य) ४५, व्याज (२०४९ १२६८)**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४२०/प्र.क्र.१३२/पापु-२३

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ११ नोव्हेंबर, २०२०

**वाचा :-**

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६ एप्रिल, २०२०
२. शासन अधिसूचना, वित्त विभाग क्रमांकः भनिनि-२०२०/प्र.क्र.९/सेवा-६, दि. २ जून, २०२०
३. शासन अधिसूचना, वित्त विभाग क्रमांकः भनिनि-२०२०/प्र.क्र.१०/सेवा-६, दि. ३ सप्टेंबर,२०२०
४. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे पत्र क्रमांकः मजीप्रा/वित्त-१/भनिनि व्याय/सुअंप्र/३९६/२०२०-२१, दि. ९ ऑक्टोबर, २०२०

**प्रस्तावना :-**

सन १९८२-८३ पासून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे कार्यरत असलेल्या सर्व कर्मचारी / अधिकारी यांच्या भविष्य निर्वाह निधी पोटी प्राधिकरणाकडून प्राप्त होणारी वर्गणीची रक्कम / सांविधीक ठेव म्हणून लेखाशिर्ष-८३३६ नागरी ठेवी अंतर्गत शासनाकडे जमा करण्यात येते. शासनाकडे मार्च अखेर एकूण जमा असलेल्या रकमेवर भविष्य निर्वाह निधीच्या व्याज दराने प्रचलित पद्धतीने लेखाशिर्ष २०४९१२६८ अंतर्गत प्राधिकरणास व्याज देण्यात येते.

२. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीच्या ठेवीपोटी शासनाकडे दि.३१.३.२०२० अखेर रु.३०९,९९,१८,६५९/- इतकी रक्कम जमा असल्याचे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने दिनांक ९.१०.२०२० च्या पत्रान्वये कळविले आहे. सदर रकमेवर भविष्य निर्वाह

निधीच्या प्रचलित व्याज दराने माहे एप्रिल, २०२० ते सप्टेंबर, २०२० या सहा महिन्यांकरीता भविष्य निर्वाह निधीवरील व्याजापोटी प्राधिकरणाला एकूण रु.११,००,४७,११२/-इतकी व्याजाची रक्कम अनुज्ञेय आहे.

३. तथापि सदर लेखाशिर्षांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पिय तरतूदीपैकी केवळ रु.२.५० कोटी इतकी रक्कम अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध असून सदर रक्कम पुस्तकी समायोजनाद्वारे समायोजित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय :-

आर्थिक वर्ष सन २०२०-२१ मधील माहे एप्रिल, २०२० ते सप्टेंबर, २०२० या सहा महिन्यांकरीता महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याजाचा खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-१, २०४९, व्याज प्रदाने (०१) (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कर्मचारी यांच्या भविष्यनिर्वाह निधीवरील व्याज (अनिवार्य) ४५, व्याज (२०४९ १२६८) या लेखाशिर्षाखाली प्राधिकरणाला अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध असलेली रु.२,५०,००,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी पन्नास लाख फक्त) इतकी व्याजाची रक्कम या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून होणारा खर्च हा पुस्तकी समायोजनाद्वारे समायोजित करावयाचा असून हा खर्च महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याज प्रदान करण्यासाठी मागणी क्रमांक वाय-१, २०४९, व्याज प्रदाने (०१) (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कर्मचा-यांच्या भविष्यनिर्वाह निधीवरील व्याज (अनिवार्य) ४५, व्याज (२०४९ १२६८) या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखवून तो सन २०२०-२१ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधी हा "८३३६-नागरी ठेवी, ८००-इतर ठेवी, (००) (०८) महाराष्ट्र पाणी पुरवठा व मलनि:सारण मंडळाच्या कर्मचा-यांचा भविष्य निर्वाह निधी (८३३६ ५०६७) " या शिर्षाखाली पुस्तकी समायोजनाने जमा करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/ अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२० अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारात तसेच वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक २३९/व्यय-३, दिनांक २८.१०.२०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर निधी भविष्य निर्वाह निधीवरील व्याजाची रक्कम असून या निधीचे

पुस्तकी समायोजन करण्यात येत असून या शासन परिपत्रकातील नमूद अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१११११५४५३७६१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2020.11.11 16:37:53 +05'30'

**चेतन निकम**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. विधानसभा / विधान परिषद सदस्य, सर्व
२. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
३. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
६. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई
१०. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थसंकल्प-१८)
११. कार्यासन पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१२. निवड नस्ती कार्यासन पापु-२३